**महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य यांच्या अधिनस्त संचालक,न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील प्रयोगशाळांमधील १४७ पदे करार पध्दतीने व बाहय यंत्रणेव्दारे भरण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एफएसएल-०४१७/प्र.क्र.२२३/पोल-४,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २३ ऑगस्ट, २०१७.

संदर्भ : १) शासन निर्णय,गृह विभाग, क्र.एफएसएल-०४१४/प्र.क्र.४९/पोल-४, दि.२३.०३.२०१६.
२) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.मुं/का/८०८-०९/१७, दि.४.२.२०१७.

**शासन निर्णय :-**

महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त संचालक,न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील प्रयोगशाळांमधील प्रलंबित प्रकरणांची वाढती संख्या व थकित प्रकरणांचा निपटारा तातडीने करण्याकरिता तसेच विश्लेषण अहवाल मा. न्यायालयास वेळेत सादर करणे शक्य व्हावे, याकरिता आवश्यक असणारी ९८ (सहायक रासायनिक विश्लेषक गट-ब (४९) + वैज्ञानिक सहायक, गट-क (४९) )पदे करार पध्दतीने व प्रयोगशाळा परिचर, गट-ड (४९) पदे बाहय यंत्रणेमार्फत मार्फत भरण्यास खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

| **करार पध्दतीवर मुलाखतीव्दारे भरावयाची पदे** | | | | |
|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **पदनांम** | **पदसंख्या** | **विहित केलेले आरक्षण** | **मासिक मानधन रू.** |
| १ | सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब | ४९ | अ.जा.-६, अ.ज.- ३, विजा (अ)-१, भज (ब)-१, भज (क)-२, भज (ड) -१ विमाप्र-१, इमाव- ९, खुला-२५ | २१,०००/- |
| २ | वैज्ञानिक सहायक, गट-क | ४९ | अ.जा.- ६, अ.ज.-३, विजा (अ) - १, भज (ब) -१, भज (क)-२, भज (ड) -१ विमाप्र-१, इमाव-९, खुला- २५ | १८,०००/- |
| **बाहय यंत्रणेव्दारे भरावयाची पदे** | | | | |
| ३ | प्रयोगशाळा परिचर,गट-ड | ४९ | अ.जा.-६, अ.ज.-३, विजा (अ) -१, भज (ब)-१, भज (क)- २,भज (ड)-१ विमाप्र -१, इमाव-९, खुला - २५ | १२,०००/- |
| एकूण पदे | | १४७ | | |

२. सदर शासन मान्यता खालील अटींच्या अधीन राहील.

(१) पदभरती करतांना जास्त खपाच्या किमान २ वर्तमानपत्रात जाहिरात देण्यात यावी.तसेच विहित पध्दतीने निवड प्रक्रिया पूर्ण करावी.

(२) उपरोक्त पदांवरील नियुक्त्या एक वर्षापेक्षा कमी किंवा सदर पदावर नियमित नियुक्तीसाठी उमेदवार उपलब्ध होतील तो कालावधी यापैकी जो कमी असेल तेवढया कालावधीसाठी करण्यात याव्यात.

(३) कराराचा कालावधी संपुष्टात येताच नियुक्ती संपुष्टात येईल व सदर पदावर केलेल्या सेवेमुळे अन्य कोणत्याही पदावर नियुक्ती मिळण्याचा/समावेशनाचा हक्क प्राप्त होणार नाही, ही बाब नियुक्ती आदेशात स्पष्ट करण्यात यावी.

(४) सदर पदे भरताना शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: संकीर्ण-२७१५/ प्र.क्र.१००/१३, दि.१७.१२.२०१६ मधील नमूद केलेल्या अटी व शर्तीचे कटाक्षाने पालन करावे.

(५) सदर पदावर नियुक्ती करताना मुंबई उच्च न्यायालयातील रिट याचिका क्र.८५/२००८ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाचा भंग होणार नाही, अशा त-हेने नियुक्ती करण्यात येईल याची विभागाने दक्षता घ्यावी.

(६) अशा प्रकारे करार व बाहय यंत्रणेव्दारे नियुक्तीमुळे सद्य:स्थितीत शासन सेवेत असलेल्या कोणत्याही अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीच्या संधीवर प्रतिकूल परिणाम होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

(७) या पदांवर नियुक्त करण्यात येणा-या अधिकारी/कर्मचा-यांना वरीलप्रमाणे वित्त विभागाने ठरवून दिलेल्या मर्यादेत ठोक मानधन देण्यात यावे.

(८) सदर पदे सेवाप्रवेश नियमातील तरतूदींनुसार भरण्यात यावीत.

(९) सदर नियुक्ती केवळ तात्पुरत्या स्वरुपाची असून सदर अधिका-यांना कोणतीही सेवासातत्य मिळण्याबाबत कोणताही हक्क राहणार नाही.

(१०) बाहययंत्रणेव्दारे पदे भरतांना शासन परिपत्रक,वित्त विभाग,दि.२.२.२०१३ व दि.२.१२.२०१३ मधील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करावे

३. प्रस्तुत पदे भरतांना संचालनालयाच्या स्तरावरील निवड समितीने आवश्यक ती कार्यपध्दती ठरवावी व त्यानुसार लेखी परिक्षा घ्यावयाची असल्यास ती सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी विहित केलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार पारदर्शक पध्दतीने राबविण्यात यावी.

४. प्रस्तुत प्रकरणी "करार पध्दतीने नियुक्तीवर होणारा खर्च गृह विभाग, मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस (००) ११६, न्यायसहायक विज्ञान (००) (०१) न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा (२०५५०३१९) ०१-वेतन" या लेखाशिर्षाखाली तसेच "बाहय यंत्रणेद्वारे नियुक्तीवर होणारा खर्च गृह विभाग, मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस (००) ११६, न्यायसहायक विज्ञान (००) (०१) न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा (२०५५ ०३१९) १३- कार्यालयीन" खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४१/२०१७/का.१३, दि.२९.६.२०१७ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र २३९/१७/व्यय-७,दि.१४.०८.२०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२३१२१९२९५८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sunil J Sovitkar

Digitally signed by Sunil J Sovitkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3d8ee31cf28155a3c297f1c4b60ba7aa7197b86c24ce4eb660c798a1afe6f9cc, cn=Sunil J Sovitkar
Date: 2017.08.23 12:09:47 +05'30'

**( सु.ज.सोवितकर )**
**उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
२) महासंचालक (न्यायीक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) प्रधान सचिव (विशेष), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
५) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
८) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/पुणे/औरंगाबाद/नाशिक/अमरावती/कोल्हापूर/नांदेड
९) उपसंचालक, प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, नागपूर/पुणे/औरंगाबाद/ नाशिक/अमरावती/कोल्हापूर/नांदेड
१०) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१३) मंत्रालय, मुंबई,
११) वित्त विभाग (व्यय-७) मंत्रालय, मुंबई-३२,
१२) निवडनस्ती/गृह विभाग (पोल-४).